"मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत "जिल्हा तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत रोजगार निर्मिती करिता "विशेष योजना" राबविण्याबाबत मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र :- माविका -२०२१/प्र.क्र.३१/का.१४१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०२ डिसेंबर, २०२१

वाचा-

१) नियोजन विभाग,शासन निर्णय क्रमांक: माविमि २०१०/प्र.क्र.८१/का.१४१८,दि.१९ जुलै, २०११.
२) वित्त विभाग, शासन निर्णय. क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१

**प्रस्तावना-**

"मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यातील "महिला बचतगट" आणि अनुसूचित जाती जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता "रोजगार निर्मिती" वर अधिक भर देण्यासाठी प्रत्येक तालुक्याला रु.२.०० कोटी रुपये याप्रमाणे रु.२५०.०० कोटी नियतव्यय उपलब्ध करुन देण्याचे प्रस्तावित आहे, अशी घोषणा अर्थसंकल्पिय भाषणामध्ये करण्यात आलेली आहे. "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यांतील महिला बचतगट आणि अनुसूचित जाती जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता प्रत्येक तालुक्याला रु.२.०० कोटी निधी" रोजगार निर्मिती" वर अधिक भर देण्यासाठी "विशेष योजना" तयार करुन त्या राबविण्याबाबत भर द्यावयाचा असल्याने "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत राबविण्यात येणा-या विविध नियमित योजनांकरिता प्रत्येक जिल्ह्याला प्राप्त एकूण निधीच्या २० टक्के मर्यादेमुळे २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यांतील "रोजगार निर्मिती" करिता समान प्रमाणात निधी उपलब्ध होत नव्हता.त्यामुळे या प्रत्येक मागास तालुक्यातील नागरीकांना "रोजगार निर्मिती" करिता अधिक संधी समप्रमाणात उपलब्ध करुन देण्याकरिता "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" आर्थिक वर्ष सन २०२१-२२ करीता राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय-**

"मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ मागास तालुक्यातील महिला बचत गट आणि अनुसूचित जाती/जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता "रोजगार निर्मिती" वर अधिक भर देण्यासाठी "जिल्हा/ तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना " तयार करुन त्या राबविण्यासंदर्भात" मार्गदर्शक सूचना" खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत ;-

(१) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांमध्ये तेथील स्थानिक अर्थव्यवस्थेची परिस्थिती विचारात घेऊन "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना"तयार करताना त्याची उपयुक्तता व शाश्वतता विचारात घेऊन व जास्तीत जास्त महिला बचत गट/ शेतकरी उत्पादक गट या वर्गातील लोकांकरिता "रोजगार निर्मिती" करता येईल, हे उद्दिष्ट लक्षात ठेवणे आवश्यक राहील. अशा "विशेष योजना" तयार करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

(२) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांमध्ये तेथील स्थानिक अर्थव्यवस्थेची परिस्थिती विचारात घेऊन "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजनां" चा प्रस्ताव विभागीय आयुक्त यांचेकडे सादर करणे आवश्यक राहणार नाही. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा मानव विकास समिती यांनी "विशेष योजना" करिता तालुकानिहाय प्रस्ताव तयार करुन आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद यांचेकडे

सादर करावा. तद्नंतर आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद यांनी जिल्हाधिका-यांनी शिफारस केलेला तालुकानिहाय प्रस्ताव "मानव विकास कार्यक्रम" च्या उद्देशांशी सुसंगत आहे व स्थानिक अर्थव्यवस्थेला चालना देणारा आहे यांची शहानिशा करुन त्यास तत्वतः मान्यता द्यावी. नियोजन विभाग, शासन निर्णय दि.१९/०५/२०१८ अन्वये विभागीय आयुक्त यांना प्रदान करण्यात आलेले अधिकार या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत. “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन२०२१-२२ मध्ये "जिल्हा /तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत “विशेष योजना”करिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या २३ जिल्ह्यातील सर्व तालुक्यांना रु.१.०० कोटी प्रति तालुका प्रमाणे निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत आहे. वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग प्रामुख्याने महिला बचतगट व अनुसूचित जाती /जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता करण्यात यावा. "रोजगार निर्मिती" संबंधित "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत “विशेष योजना” तयार करताना राज्य शासनाच्या "रोजगार निर्मिती" करणारे इतर कार्यक्रम/ योजनांमध्ये द्विरुक्ती होऊ नये. काही ठिकाणी यंत्रणेकडे विविध योजनेमधून निधी उपलब्ध असेल आणि असा निधी पुरेसा नसेल आणि असा निधी वापराविना पडून असेल तर एकूण उपलब्ध निधीच्या कमाल २५ टक्क्यापर्यत आवश्यकतेनुसार निधी पुरक निधी म्हणून उपलब्ध करुन देता येईल, मात्र याबाबतची खात्री जिल्हाधिकारी यांनी करावी. संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून प्राप्त प्रस्तावांवर १५ दिवसांचे आत आयुक्त (मानव विकास) यांनी त्यास तत्वतः मंजुरी देणे अपेक्षित राहील.

(३) “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन२०२१-२२ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत विशेष योजना राबविण्याबाबतचे प्रस्ताव तयार करताना स्थानिक अर्थव्यस्थेला केंद्रीत करुन महिला बचतगट आणि अनुसूचित जाती/जमातीला प्राधान्य राहील. प्रस्ताव तयार करताना उत्पन्नवाढ करण्यास उपयुक्तता व शाश्वतता याव्यतिरिक्त " सामाजिक व आर्थिकदृष्ट्या मागास प्रवर्ग" जनगणना (SECC) मध्ये समावेश असलेल्या गरीब वर्गाचा विचार करता येईल. या वर्गाचे शेतकरी उत्पादक गट व महिला बचत गट यांचेमार्फत "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" राबविण्यात यावी. यातील एकाच योजना/ प्रकल्पाकरिता मोठ्या आर्थिक तरतूदीची योजना प्रस्तावित करु नये. प्रत्येक तालुक्यांमध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" तयार करताना वेगवेगळ्या गावांमध्ये व प्रत्येक तालुक्यांकरिता किमान चार स्वतंत्र प्रस्ताव जिल्हाधिकारी यांनी "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांचेकडे सादर करावे. रोजगार निर्मितीच्या “विशेष योजना” निवडताना आवश्यकतेनुसार प्रती एकक गुंतवणूक खर्चामध्ये तयार होणारी एकंदरीत रोजगार क्षमता म्हणजेच “रोजगार क्षमता/एकूण खर्च” (Total Direct & Indirect Employment/Total Cost) ह्या सुत्रासह इतर स्थानिक अर्थव्यवस्था परिस्थितीचा विचार जिल्हाधिकारी यांनी करावा. तसेच स्थानिक गरजेनुसार आरोग्य व शिक्षण विषयक प्रस्ताव घेणे आवश्यक असल्यास जिल्हाधिकारी यांनी सर्वकष विचार करुन तसेही प्रस्ताव सादर करावेत.

(४) मानव विकास कार्यक्रमांतर्गत "Action Room to Reduce Poverty" संदर्भात १३ जिल्ह्यातील निवडक २७ तालुक्यांमध्ये कौशल्य विकास व रोजगारनिर्मिती करण्यास राबविण्यात येणा-या तालुकास्तरावरील विशेष योजनांबाबत, वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ व वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५ मधील भाग १, उप विभाग ३ अ.क्र.४ नियम क्र.२७(२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास असलेले "योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तिय मंजूरी धरुन ) अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु.५.०० कोटीपर्यत मान्यता देण्याचे" वित्तिय अधिकार जिल्हाधिकारी यांना यापुर्वी नियोजन विभाग,शा.

नि. क्र. माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८, दि.१४/०२/२०१९ अन्वये प्रदान करण्यात आले आहेत. या धर्तीवर "मानव विकास कार्यक्रम"खाली "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यतेचे वित्तीय अधिकार संबधित जिल्हाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

(५) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन२०२१-२२ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" द्वारे राबविण्यात येणा-या कामाला "तांत्रिक मान्यता" देण्याचे अधिकार संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेच्या विभागीय व जिल्हास्तरीय अधिकारी यांना प्रशासकीय विभागाने प्रदान केलेल्या वित्तीय मर्यादे प्रमाणे राहील.

(६) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन २०२१-२२ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" तयार करतांना महिला बचत गट, लोक संचलित साधन केंद्र, शेतकरी गट, शेतकरी उत्पादक कंपनी, अनुसूचित जाती/जमातीचे शेतकरी उत्पादक कंपनी, आदिवासीचे वन धन केंद्र, जीवनोन्नती अभियानाचे ग्रामसंघ, आत्मा गट यांच्या माध्यमातून घेणे आवश्यक राहील.

(७) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांमध्ये तेथील स्थानिक अर्थव्यवस्थेची परिस्थिती विचारात घेऊन "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" यासाठी सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थी समुहासाठी ७५:२५ तसेच अनुसूचित जाती/जमाती प्रवर्गातील लाभार्थी समुहासाठी ९०:१० याप्रमाणे अनुदान व लाभार्थी सहभाग प्रत्येक "विशेष योजना" करिता खालीलप्रमाणे दोन टप्प्यात विभागण्यात येत आहे.

| **टप्पा** | **सर्वसाधारण प्रवर्ग** | | **अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती / महिला प्रवर्ग** | |
|---|---|---|---|---|
| | राज्यशासनाचा हिस्सा (अनुदान) (%) | सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थी सहभाग (%) | राज्यशासनाचा हिस्सा ( अनुदान) (%) | अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थी सहभाग (%) |
| पहिला | ६० | १० | ६० | १० |
| दुसरा | १५ | १५ | ३० | - |
| **एकूण** | **७५** | **२५** | **९०** | **१०** |

(८) "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये " जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" राबविताना पहिल्या टप्प्यात राज्य शासनाचा ६० % सहभाग देताना सर्वसाधारण प्रवर्गातील तसेच अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थी यांचा १०% "लाभार्थी समुह सहभाग" (Beneficiary Group Contribution) "राष्ट्रीयकृत बँक" (Nationalised Bank) मध्ये असलेली "बचत बँक खाते (Saving Bank Account)" मध्ये जमा असणे आवश्यक राहील. जिल्हा नियोजन अधिकारी/ सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) यांनी या ७० % निधीचा विनियोग उद्दिष्टपूर्ती करिता करण्यात येत आहे, याची खातरजमा करावी व "जिल्हाधिकारी" यांचेकडे "निरीक्षण अहवाल (Inspection Report)" सादर करावा. "जिल्हाधिकारी" यांनी त्या आधारावर लाभार्थी समूहास २ टप्प्यात निधी वितरीत करण्यास अनुमती द्यावी. दुस-या टप्प्यात म्हणजेच अंतिम टप्प्यात सर्वसाधारण लाभार्थी समुह यांचा उर्वरीत१५ % सहभाग "राष्ट्रीयकृत बँक (Nationalised Bank)" मध्ये असलेल्या "बचत बँक खाते (Saving Bank Account)" मध्ये प्रथम जमा केल्यावर १५ % राज्य शासनाचा हिस्सा वितरीत करावा. तसेच अनुसूचित

जाती /अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता दुस-या (अंतिम) टप्प्यात ३०% निधी वितरीत करावा. तथापि, ज्या प्रकल्प/कामांसाठी एकाच वेळी संपूर्ण १००% निधी उपलब्ध होणे अनिवार्य होत असेल अशा परिस्थितीत लाभार्थी समूहाचा सहभाग (Beneficiary Group Contribution) जमा करुन घेऊन एकाच टप्प्यात राज्य शासनाचा पूर्ण हिस्सा वितरीत करणेबाबतचा उचित निर्णय "जिल्हाधिकारी" यांना परिस्थितीनुसार कारणे नमूद करून घेता येईल.

(९) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत “Action Room to Reduce Poverty” खाली यापूर्वी हाती घेण्यात आलेला "विशेष योजना" व “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत नियमितपणे २०% निधीतून हाती घेण्यात आलेल्या "जिल्हा तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत राबविण्यात आलेल्या योजनांची उत्पन्नवाढीकरिता उपयुक्तता व शाश्वतता विचारात घेऊन; संबंधित जिल्हाधिकारी यांनी " आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांचेकडे “मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत आर्थिक वर्ष सन२०२१-२२ मध्ये "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" बाबतचे प्रस्ताव विचारार्थ सादर करणे अपेक्षित राहील.

(१०) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत महिला बचतगट आणि अनुसूचित जाती/जमातीचे सक्षमीकरण करण्याकरिता रोजगार निर्मिती संबधित “विशेष योजना” प्रस्ताव तयार करताना “शाश्वत विकास ध्येये ( Sustainable Development Goals)” अंतर्गत असलेली विशेषतः "गरीबी निर्मूलन, उपासमारीचे समूळ उच्चाटन" सारखी ध्येये साध्य करण्यास उपयुक्त ठरेल, याचाही विचार स्थानिक लाभार्थी समुह निवडताना जिल्हाधिकारी यांनी करणे अपेक्षित राहील.

(११) “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" राबविण्यासाठी प्राधान्याने "आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद" यांचेकडे शिफारस करणे व १५ दिवसांत " तत्वतः मान्यता" (In Principal Approval) मिळाल्यानंतर "जिल्हाधिकारी" कडून "प्रशासकिय मान्यता" (Administrative Approval ) देऊन कार्यान्वयीन यंत्रणेला निधीचे वितरण, प्रगतीचा व खर्चाचा आढावा घेणे इत्यादी बाबत संगणक प्रणाली वापरुन अद्यावत माहिती उपलब्ध होण्याकरिता "आयुक्त,मानव विकास, औरंगाबाद" यांनी प्राधान्याने पोर्टल विकसित करावे. या पोर्टलवर कार्यवाही झाल्यावर “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत "जिल्हा/तालुका स्पेसिफिक योजना" अंतर्गत "विशेष योजना" बाबत अद्ययावत माहिती सादर करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबधित जिल्हा नियोजन अधिकारी/सहायक जिल्हा नियोजन अधिकारी यांची राहील.

३. “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत राबविण्यात येणा-या तालुका स्तरावरील योजनेवर होणारा खर्च हा “मागणी क्रमांक ओ-१, २०५३, जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०४) (०१) मानव विकास निर्देशांक वृध्दी करणे (२०५३१२३१) दत्तमत" या लेखाशीर्षातंर्गत, उद्दिष्ट "३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत सोबत जोडलेल्या "परिशिष्ट अ" प्रमाणे एकूण रु.१२५.००कोटी (अक्षरी रु. एकशे पंचवीस कोटी) संबंधित जिल्ह्यांचे जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. “आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद” व संबंधित जिल्हाधिकारी यांनी सदरचा खर्च हा सन २०२१-२२ या वित्तिय वर्षात खर्ची घालावा व विहित मर्यादेत खर्च करावा. त्याचप्रमाणे मंजुर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

५. “आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद” यांनी मानव विकास कार्यक्रम अंतर्गत वर नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपुर यांनी नोंदविलेला खर्च यामध्ये मेळ घालून प्रत्येक महिन्यात केलेल्या खर्चाचा अहवाल शासनास त्यापुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करावा.

६. नियोजन विभागाचा सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३ दि.२४/०६/२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. नियोजन विभागाचा हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२११२०२१५४५३७८२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.12.02 18:20:57 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर ,
२. आयुक्त मानव विकास,मानव विकास आयुक्तालय ,औरंगाबाद
३. विभागीय आयुक्त कोकण/नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद / नागपूर
४. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष मानव विकास समिती,पालघर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, शिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर व गडचिरोली.
५. जिल्हा नियोजन अधिकारी/ सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, पालघर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, नंदुरबार, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर व गडचिरोली.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय
७. वित्त विभाग (कार्यासन-अर्थ.१६),मंत्रालय,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. कार्यासन अधिकारी (का .१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती.

**शासन शासन निर्णय क्र. माविका-२०२१/प्र.क्र.३१/का.१४१८, दिनांक : ०२ डिसेंबर, २०२१**

## परिशिष्ट- अ

(रु. लाखात)

| अ. क्र. | जिल्हयांचे नाव | तालुके संख्या | विशेष योजना ( प्रति तालुका रु१००.०० लक्ष प्रमाणे ) | एकूण आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| १ | पालघर | ६ | ६००.०० | ६००.०० |
| २ | ठाणे | २ | २००.०० | २००.०० |
| ३ | रायगड | १ | १००.०० | १००.०० |
| ४ | सिंधुदुर्ग | १ | १००.०० | १००.०० |
| ५ | नाशिक | ८ | ८००.०० | ८००.०० |
| ६ | धुळे | ४ | ४००.०० | ४००.०० |
| ७ | नंदूरबार | ६ | ६००.०० | ६००.०० |
| ८ | जळगाव | ७ | ७००.०० | ७००.०० |
| ९ | जालना | ८ | ८००.०० | ८००.०० |
| १० | परभणी | ९ | ९००.०० | ९००.०० |
| ११ | हिंगोली | ३ | ३००.०० | ३००.०० |
| १२ | बीड | १ | १००.०० | १००.०० |
| १३ | नांदेड | ९ | ९००.०० | ९००.०० |
| १४ | बुलडाणा | ७ | ७००.०० | ७००.०० |
| १५ | अकोला | १ | १००.०० | १००.०० |
| १६ | वाशिम | ४ | ४००.०० | ४००.०० |
| १७ | अमरावती | २ | २००.०० | २००.०० |
| १८ | यवतमाळ | ९ | ९००.०० | ९००.०० |
| १९ | नागपूर | २ | २००.०० | २००.०० |
| २० | भंडारा | ५ | ५००.०० | ५००.०० |
| २१ | गोंदिया | ८ | ८००.०० | ८००.०० |
| २२ | चंद्रपूर | ११ | ११००.०० | ११००.०० |
| २३ | गडचिरोली | ११ | ११००.०० | ११००.०० |
| | **एकूण** | **१२५** | **१२५००.००** | **१२५००** |

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.12.02 18:21:15 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन